**अधीक्षक अभियंता,कुकडी प्रकल्प मंडळ,पुणे व त्यांच्या अधिपत्याखालील ५ विभागातील व अंतर्गत उपविभागातील रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांना शासन निर्णय दि.७/४/२०१५ अन्वये मुदतवाढ देण्यात आली आहे . त्यातील विवरणपत्र-ब मध्ये अधिक ७ पदांना मुदतवाढ देण्याबाबतचे शुध्दिपत्रक.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्र. मुदतवाढ -०२१५/कुप्रमं/ (१२६/२०१५)/मोप्र-१**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- ०६ नोव्हेंबर,२०१५

**वाचावे :**१) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.मुदतवाढ -०६१४/ (२०१/२०१४)/मोप्र-१ दि.०५/०७/२०१४
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.मुदतवाढ -०२१५/कुप्रमं/ (१२६/२०१५)/मोप्र-१ मोप्र- १ दि.०७/०४/२०१४.
३) अधीक्षक अभियंता ,कुकडी प्रकल्प मंडळ,पुणे यांचे कुप्रमं/पशा/कार्या-६, दि. २२/५/२०१५
४) अधीक्षक अभियंता ,कुकडी प्रकल्प मंडळ,पुणे यांचे कुप्रमं/प्रशा/कार्या-६, दि.५/१०/२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

अधीक्षक अभियंता,कुकडी प्रकल्प मंडळ,पुणे व त्यांच्या अधीक्षक अभियंता,कुकडी प्रकल्प मंडळ,पुणे व त्यांच्या अधिपत्याखालील ५ विभागातील व अंतर्गत उपविभागातील रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील १३५ पदांना शासन निर्णय दि.७/४/२०१५ अन्वये मुदतवाढ देण्यात आली आहे.

**शुध्दीपत्रक**

संदर्भीय क्रमांक ३ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार कार्यकरी अभियंता, पिंपळगाव जोगे धरण उपविभाग, नारायणगांव विभागातील रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवरील ७ कर्मचा-यांना दि.१/३/२०१५ ते दि.२९/२/२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यास सदरहू शासन निर्णयातील विवरण पत्र ब मध्ये सुधारणा करण्यात येत असून विवरणपत्र-ब सोबतच्या प्रमाणे वाचावे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०६१६३१२६४२२७ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijendra Prabhakar Palwankar

Digitally signed by Vijendra Prabhakar Palwankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7cb5ce90d018bdc109ad48f37ca4a3b06b0347375607bff9b7cc525c4c213e75, cn=Vijendra Prabhakar Palwankar
Date: 2015.11.06 16:33:59 +05'30'

**(वि.प्र. पालवणकर )**
कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग

सहपत्र -विवरणपत्र-ब

**प्रत सहपत्रासह -**

१) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे
३) मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे
४) अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ,पुणे
५) कार्यकारी अभियंता,पिंपळगाव जोगे धरण विभाग,नारायणगाव.
६) कार्यकारी अभियंता,डिंभे धरण विभाग,पुणे.
७) कार्यकारी अभियंता,निरा देवघर प्रकल्प विभाग,सांगवी ,भाटघर.
८) कार्यकारी अभियंता,प्रकल्प संकल्पचित्र कालवे विभाग क्रं. १,पुणे.
९) अर्थ-१,कार्यासन,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०) कक्ष अधिकारी (आ-प्रशि) जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई-३२
११) प्रत: मोप्र-१(संग्रहार्थ)

## विवरणपत्र -ब(सुधारीत)

**संदर्भ:-** शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.मुदतवाढ -०२१५/कुप्रमं/ (१२६/२०१५)/मोप्र-१ मोप्र- १ दि.०७/०४/२०१४ चे सहपत्र.

कार्यकारी अभियंता, पिंपळगाव जोगे धरण उपविभाग , नारायणगांव विभागातील रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवरील पदांना मुदतवाढ कालावधी दि. १/३/२०१५ ते दि.२९/२/२०१६.

| अ.क | कर्मचा-याचे नाव | पदनाम | जन्मदिनांक | सेवानिवृत्ती दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.आर.एफ.मोमीन | भांडार कारकून | १/६/१९६१ | ३१/५/२०१९ |
| २ | श्री.जी.एस.जाधव | मुकादम | १/६/१९६२ | ३१/५/२०२२ |
| ३ | श्री.ए.डी.देवकर | मुकादम | १/६/१९५७ | ३१/५/२०१७ |
| ४ | श्री.एस.एन.भोर, | चौकीदार | १/३/१९५८ | २८/२/२०१८ |
| ५ | श्री.झेड.बी.जाधव, | चौकीदार | २५/२/१९६० | २८/२/२०२० |
| ६. | श्री.व्ही.ए.औटी | मजूर | १/६/१९५७ | ३१/५/२०१७ |
| ७ | श्री.एस.एच.मानकर | मुकादम | ९/११/१९६० | ३०/११/२०२० |
| एकूण सर्व पदे १३५ +७ =१४२ | | | | |